एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षण कार्यक्रम-७ मधील परिविक्षाधिन उप अधीक्षक भूमि अभिलेख(गट-ब) यांना महसुली विभाग वाटप व पदस्थापना देण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
**शासन आदेश, क्रमांक : टिआरएन-०२२४/प्र.क्र.५९/ई-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : ०७ जून, २०२४.

संदर्भ:-

१)सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना, क्र.एसआरव्ही-२०२१/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१
२)सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.०१.२०१४
३)सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना, क्र. टिआरएन-०५१४/प्र.क्र.२०/१८-ब, दि.०७.११.२०१५
४)सामान्य प्रशासन विभागाचे पत्र, क्र. टिआरएन-२०२४/प्र.क्र.२३/प्रशि-३, दि.१५.०२.२०२४

**शासन आदेश :**

एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-७ (सीपीटीपी-७) या तुकडीमधील परिविक्षाधीन उप अधीक्षक भूमि अभिलेख यांचे खातेनिहाय प्रशिक्षण दि.१७.०१.२०२२ पासून सुरु झाले होते. एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षण कार्यक्रम-७ (सीपीटीपी-७) या तुकडीमधील अधिकाऱ्यांचा परिविक्षाधिन कालावधी हा दोन वर्षाचा असून तो परिविक्षाधिन कालावधी पूर्ण झालेला आहे. वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर यांनी दि.०७.०२.२०२४ च्या पत्रान्वये सीपीटीपी-७ अंतर्गत उप अधीक्षक भूमि अभिलेख,गट-ब संवर्गातील उमेदवारांचे अंतीम मूल्यमापन व गुणपत्रकाच्या आधारे गुणानुक्रमे तात्पुरती परस्पर सेवाज्येष्ठता सामान्य प्रशासन विभागास सादर केली असून त्यानुसार सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये उप अधीक्षक भूमि अभिलेख, गट-ब संवर्गातील परिविक्षाधिन अधिकाऱ्यांची गुणानुक्रमे सेवाज्येष्ठता निश्चित केली आहे. संदर्भ क्र.१ येथील शासन अधिसूचना, महसूल विभाग वाटप, नियम २०२१ मधील तरतुदीनुसार भूमि अभिलेख विभागातील उप अधीक्षक भूमि अभिलेख (गट-ब) संवर्गातील विभागनिहाय रिक्त पदांची संख्या व सामान्य प्रशासन विभागाने निश्चित केलेली सेवाज्येष्ठता यांच्या अनुषंगाने एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षण कार्यक्रम-७ अंतर्गत उप अधीक्षक भूमि अभिलेख,गट-ब संवर्गातील संबंधित ५ परिविक्षाधिन अधिकाऱ्यांकडून महसूल विभागाचे विकल्प प्राप्त करुन घेतले आहेत.

२. उप अधीक्षक भूमि अभिलेख,गट-ब संवर्गातील रिक्त पदे व संबंधित परिविक्षाधिन अधिकाऱ्यांचे महसूली विभागाबाबतचे प्राप्त विकल्प या बाबी विचारात घेऊन एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षण कार्यक्रम-७ अंतर्गत उप अधीक्षक भूमि अभिलेख,गट-ब संवर्गातील ५ परिविक्षाधिन अधिकाऱ्यांना संदर्भ क्र.१ येथील "महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०२१" मधील तरतुदीनुसार खालील तक्त्यात स्तंभ क्र.३ व स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे महसूल विभाग वाटप व रिक्त पदावर नियमित पदस्थापना देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | महसूली विभाग वाटप | पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.अजय मुरलीधर भुंगे | पुणे | कार्यालय अधीक्षक, जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.राज्य), पुणे |
| २ | श्री.शिवराज उमेश जाधव | छत्रपती संभाजीनगर | निदेशक क्र.४, भूमि अभिलेख प्रशिक्षण प्रबोधिनी, छत्रपती संभाजीनगर |
| ३ | श्री.प्रविण जगन्नाथ कुंजीर | अमरावती | उप अधीक्षक भूमि अभिलेख, वाशिम, जि.वाशिम |
| ४ | श्री.मोहम्मद फयाझ मोहम्मद मुनिर शेख | छत्रपती संभाजीनगर | उप अधीक्षक भूमि अभिलेख, अर्धापूर, जि.नांदेड |
| ५ | श्रीम. आरती भरतराव गवई | नागपूर | कार्यालय अधीक्षक, उप संचालक भूमि अभिलेख, नागपूर प्रदेश, नागपूर |

३. उक्त परिविक्षाधिन उप अधीक्षक भूमि अभिलेख (गट-ब) यांना खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून नियमित पदावर पदस्थापना देण्यात येत आहे :-

(अ) सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन क्र. २ येथील शासन निर्णयानुसार एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षणाचे धोरण निश्चित करण्यात आले असून संदर्भाधिन क्र.३ येथे नमूद केलेल्या शासन अधिसूचनेन्वये एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत प्रशिक्षण घेणाऱ्या उमेदवारांची सेवाज्येष्ठता निश्चित करण्याचे नियम विहित केले आहेत. तसेच शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.२१.०७.२०१७ अन्वये राज्यसेवा परीक्षेद्वारे शासन सेवेत निवड झालेल्या अधिकाऱ्यांसाठी एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम राबविण्यात येत आहे. या अभ्यासक्रमामध्ये मुंबई विद्यापीठाच्या मूल्यांकन पद्धतीचा अभ्यासक्रम राबविण्यात येत आहे. या अभ्यासक्रमामध्ये मुंबई विद्यापीठाच्या मूल्यांकन पद्धतीचा अवलंब करुन दोन वर्षाच्या प्रशिक्षण कालावधीत एकूण चार सत्रामध्ये घेण्यात येणा-या परीक्षांती एकूण १६०० गुणांपैकी प्राप्त होणाऱ्या गुणांचे २०० गुणांमध्ये रुपांतर करुन संबंधित अधिका-यांना मिळालेले गुण तसेच राज्यसेवा (मुख्य) परीक्षेमध्ये मिळालेले गुण यांची बेरीज करुन त्यानुसार सदर अधिकाऱ्यांची त्या तुकडीतील सेवाज्येष्ठता निश्चित करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार, सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधिन क्र.४ येथील पत्रांन्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-७ मधील परिविक्षाधिन उप अधीक्षक भूमि अभिलेख यांची गुणानुक्रमे सेवाज्येष्ठता निश्चित केली आहे.

(ब) सदर ज्येष्ठता तात्पुरती ज्येष्ठता म्हणून मान्य करण्यात आली आहे. या तात्पुरत्या ज्येष्ठता यादीतील क्रमांकानुसार अधिकाऱ्यांना संदर्भ क्र.१ येथे नमूद केलेल्या अधिसूचनेमधील तरतूदींनुसार महसूल विभाग वाटप करण्यात आलेला आहे. सदर अधिकाऱ्यांनी वाटप करण्यात आलेल्या महसूली विभागात किमान तीन वर्षे इतका सेवा कालावधी पूर्ण करणे अनिवार्य आहे.

४. सदरील आदेश तात्काळ अंमलात येत असून उपरोक्त नमूद अधिका-यांना पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी ते धारण करत असलेल्या पदावरून या आदेशान्वये एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. संबंधित अधिका-यांना पदस्थापनेच्या पदावर रुजू होण्याकरिता जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.राज्य), पुणे यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी. संबंधित अधिकाऱ्यांनी पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे. संबधित अधिकारी नवीन नियुक्तीच्या जागी

कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत doe६.rfd@maharashtra.gov.in या ई-मेलवर/ टपालाद्वारे शासनास त्वरित कळवावे.

**५.** संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम,१९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या तरतूदींनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन" (dies non) म्हणून गणला जाईल तसेच त्यांचेविरुद्ध महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम,१९७९ मधील तरतूदींनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

**६.** संबंधित अधिकाऱ्यास नवीन नियुक्तीच्या ठिकाणी रुजू होण्याच्या कालावधी दरम्यान शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम,१९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने संबंधित अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

**७.** सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम,१९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०६०७१२५४३८६११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SANJAY
SHANKARRAO INGLE

Digitally signed by SANJAY SHANKARRAO INGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=f0d616600e4d2f510d1c8cc19813e070ad282d2275bf6fc132a2dee97f14e0a6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D337930B14433DC62C0154AF2BBC60BB5A6EDCAA66B7F34596C50A27EB0F6333, cn=SANJAY SHANKARRAO INGLE
Date: 2024.06.07 13:07:47 +05'30'

**( संजय इंगळे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे.

**प्रत:-**

१) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
२) स्वीय सहायक, अप्पर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग मंत्रालय, मुंबई-३२.
३) सर्व उप संचालक भूमि अभिलेख.
४) संबधित अधिकारी (जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे यांच्या मार्फत)
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
६)अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७) कार्यासन ई-६ संग्रहार्थ.